**शासकीय / निमशासकीय सेवांमध्ये आणि शैक्षणिक संस्थांमध्ये मुस्लिम समाजास ५% आरक्षण देण्याच्या निर्णयाच्या अनुषंगाने पदुम विभागांतर्गत महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ नागपूर यांनी नियुक्त्यांमध्ये व शैक्षणिक संस्थेतील प्रवेशासाठी कार्यवाही करण्याबाबत निर्देश देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मपवी २०१४/प्र.क्र.६९/म्हापसू**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक: २५ ऑगस्ट, २०१४

वाचा

१) सन २०१४ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.१४, दि. ९ जुलै,२०१४ व असाधारण भाग चार क्र. ५४ दि. १४ जुलै, २०१४चे शुध्दीपत्रक

२) शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग क्र.अविवि २०१४ /प्र.क्र. ८१/का-७ दिनांक १९ जुलै,२०१४

**प्रस्तावना**

उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ च्या अध्यादेशान्वये महाराष्ट्र राज्यात शैक्षणिक व सामाजिकदृष्टया मागासलेल्या समाजासाठी भारतीय राज्य घटनेच्या अनुच्छेद १५(४), १५(५), १६(४) व ४६ मधील तरतुदीनुसार विशेष मागास प्रवर्ग (अ) (Special Backward Category-A) निर्माण करुन त्यामध्ये सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागासलेल्या मुस्लिम गटाचा समावेश करण्यात आला आहे. शासन अध्यादेश क्रमांक १४, दि. ९ जुलै, २०१४ अन्वये सामाजिक व शैक्षणिक दृष्टया मागासलेल्या मुस्लिम गटासाठी विशेष मागास प्रवर्ग-अ अंतर्गत शासकीय व निमशासकीय सरळसेवा भरतीमध्ये व शैक्षणिक संस्थेतील प्रवेशासाठी ५% आरक्षण देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या अधिनस्त महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ नागपूर यांनी व त्यांच्या अधिनस्त शासकीय व निमशासकीय शैक्षणिक संस्थांनी सरळसेवा भरतीमध्ये व शैक्षणिक संस्थेतील प्रवेशासाठी असणाऱ्या मुस्लिमांच्या ५% आरक्षणाच्या तरतूदीचे पालन करण्याकरिता निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

१) भारतीय राज्य घटनेच्या अनुच्छेद १६(४) मधील तरतुदीनुसार शासकीय व निमशासकीय सरळसेवा भरती मध्ये सध्या राज्यात अस्तित्वात असलेल्या आरक्षणाव्यतिरिक्त ५% आरक्षण नव्याने निमार्ण करण्यात आलेल्या विशेष मागास प्रवर्ग-अ (एसबीसी-ए) (Special Backward Category-A) या प्रवर्गाला देण्यात आलेले आहे.

२) भारतीय राज्यघटनेच्या अनुच्छेद १५(४), १५(५), १६(४) व ४६ मधील तरतुदीनुसार शासकीय तसेच खाजगी अनुदानित व विनाअनुदानित शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेशासाठी सध्या राज्यात अस्तित्वात असलेल्या आरक्षणाव्यतिरिक्त ५% आरक्षण नव्याने निर्माण करण्यात आलेल्या विशेष मागास प्रवर्ग-अ (एसबीसी-ए) ( Special Backward Category-A) या प्रवर्गाला देण्यात आलेले आहे.

**महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ नागपूर यांनी तसेच विद्यापीठांतर्गत अनुदानित व विनाअनुदानित शैक्षणिक संस्थांनी उपरोक्त संदर्भाधिन अध्यादेशातील तरतूदीनुसार आरक्षणाची काटेकोर अंमलबजावणी करावी.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२५१६१७१९२६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bharose Varsha M

Digitally signed by Bharose Varsha M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bharose Varsha M
Date: 2014.08.26 15:46:37 +05'30'

**व. मुं. भरोसे**
अवर सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती, (म.प.म.वि.वि. नागपूर) यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री महोदयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उपमुख्यमंत्री महोदयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा.राज्यमंत्री (पशुसंवर्धन / मत्स्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-३२
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-३२
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय मुंबई-३२.
१२.सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक
१३.आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे - १,

१४. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सेमिनरी हिल्स, नागपूर,
१५.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई-३२
१६.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
१७. प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन  नागपूर विभाग, नागपूर
१८. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, तेलंगखेडी, नागपूर-१
१९.नियंत्रक, (वित्त व लेखा)  महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, तेलंगखेडी, नागपूर-१
२०. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
२१.वरीष्ठ प्रशासन अधिकारी गट-अ प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन नागपूर विभाग,नागपूर
२२.निवड सुची (म्हापसू)